दि. २६ जानेवारी, २०२२ रोजी नवी दिल्ली येथे होणाऱ्या प्रजासत्ताक दिनी शिबिर व पंतप्रधान रॅलीमध्ये सहभागी होणाऱ्या राष्ट्रीय छात्रसेनेच्या छात्रांकरीता आयोजित शिबिरासाठी निधी मंजूरीबाबत..

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांक :- राछासे-२६२१/प्र.क्र.९७/क्रीयुसे-३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २६ ऑक्टोबर, २०२१

**वाचा :-** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१
२) क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र. राछासे/आरडीसी/२०२१-२२/(१४)/का-५/४०१३, दि. ०९ सप्टेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

दरवर्षी नवी दिल्ली येथे होणाऱ्या प्रजासत्ताक दिनी पंतप्रधान रॅलीमध्ये महाराष्ट्रातील राष्ट्रीय छात्रसेनेतील छात्रांचे पथक सहभागी होते. या अनुषंगाने नवी दिल्ली येथे आयोजित होणाऱ्या शिबिरांसाठी निधी मंजूर व वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जानेवारी, २०२२ मध्ये नवी दिल्ली येथे होणाऱ्या प्रजासत्ताक दिन शिबिर व पंतप्रधान रॅलीमध्ये सहभागी होणाऱ्या खाली नमूद युनिटमधील छात्रांकरीता आयोजित शिबिरांकरीता अपेक्षित खर्चासाठी रु. ०१,०७,२५,०००/- ( अक्षरी एक कोटी सात लक्ष पंचवीस हजार फक्त ) इतका निधी मंजूर व वितरीत करण्यास तसेच सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | शिबीराचे नाव | एकूण अधिकारी व विद्यार्थी | आहरण व संवितरण अधिकारी | मंजूर रक्कम (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | (आरडीसी) प्रजासत्ताक दिन शिबीर व पंतप्रधान रॅली सोहळा, नवी दिल्ली,२०२२ | २+५१=५३ | ९ महाराष्ट्र बटालियन, राष्ट्रीय छात्र सेना, सोलापूर | रु. ०१,०७,२५,०००/- ( अक्षरी रूपये एक कोटी, सात लक्ष, पंचवीस हजार फक्त ) |

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक ई-३, २२२४-क्रीडा व युवक सेवा-१०२, विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१)(०१) राष्ट्रीय छात्रसेना योजनेतर (२२०४-००१६)-२१

पुरवठा व सामुग्री” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या दि. २४.०६.२०२१ च्या शासन निर्णयातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. यासाठी संबंधित कार्यालयाचे समादेशक अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी व संबंधित गटप्रमुख, गटमुख्यालय यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९२३/२०२१/व्यय-५, दिनांक १८/१०/२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२६१७३०२५५६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2021.10.26 17:32:00 +05'30'

**(स्वा. म. नानल)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे प्रधान सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे प्रधान सचिव
४. मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
५. मा. राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
९. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१०. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्रसेना संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे / मुंबई विभाग
१२. जिल्हा क्रीडा अधिकारी, सोलापूर
१३. ९ महा. बटा. राष्ट्रीय छात्र सेना, सोलापूर
१४. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती, (क्रीयुसे-३)